वन विभागाची पुनर्रचना व्यवस्थापकीय माहिती प्रणाली अंतर्गत सांख्यिकी विषयक निर्माण केलेल्या पदांना सन २०१८-१९ मध्ये मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :-एफडीएम -२०१८/प्र.क्र.३६/फ-२**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :- १९ ऑक्टोबर, २०१८**

वाचावे :- १) शासन निर्णय क्रमांक, असंक-१००४/प्र.क्र.१२ (भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि.०४.१०.२००४

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.१८(१७-१८)/२३३८,दि.१४.०३.२०१८

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एफडीएम -२०१८/प्र.क्र.३६/फ-२, दि. ३१.०३.२०१८.

४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८

५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-३/यो/प्र.क्र.१ /१८-१९/११०१/१८-१९, दि.२४.०९.२०१८

**शासन निर्णय :-**

वन विभागाची पुनर्रचना या अनुषंगाने व्यवस्थापकीय माहिती प्रणाली अंतर्गत सांख्यिकी विषयक निर्माण केलेल्या २ पदांना सन २०१८-१९ मध्ये ०१.०३.२०१८ दि.३०.०९.२०१८ पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये शासनाची मंजूरी देण्यात आली होती. सदर मुदत दि.३०.०९.२०१८ रोजी संपुष्टात आली आहे. खाली दर्शविलेल्या विवरणपत्रातील **२ अस्थायी पदे ही वन विभागाच्या २५०२५ या मंजूर आकृतीबंधात** समाविष्ट असल्याने सदर २ अस्थायी पदांना संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने दि.०१.१०.२०१८ ते २८.०२.२०१९ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| वनवृत्त | पदांचे नाव | संख्या |
|---|---|---|
| नागपुर | सहायक वनसांख्यिकी | १ |
| नाशिक | वनसांख्यिकी | १ |
| | **एकूण** | २ |

२.  याबाबत होणारा खर्च -प्रधान शीर्ष - २४०६-वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), ०१ वनीकरण, ००१ संचालन व प्रशासन (००१) वन सांख्यिकी (वेतने) (२४०६ ००५१)◦ या लेखाशीर्षा खाली दर्शविण्यात यावा व सन २०१८-१९ या वर्षी त्याखालील मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.सदर कालावधी मध्ये त्यांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेवून सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे.  या नंतर सुधारीत आकृतीबंध निश्चीत करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही. तसेच आस्थापनेवरील पदांचा आढावा घेवून, सुधारीत आकृतीबंधाचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करावयाचा असल्याने त्वरीत कार्यवाही करुन शासनास प्रस्ताव सादर करावा.

३.  प्रस्तुत शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१९१५०४०३४५१९ असा आहे.  हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f33a35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2018.10.19 15:09:05 +05'30'

(अतुल कोदे)
सह सचिव
महसूल व वन विभाग

**<u>प्रतिलिपी</u>** :-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नाशिक / नागपूर
५) मुख्य वनसांख्यिकी, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे कार्यालय, नागपूर.
६) महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता)/लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर.
७) वित्त विभाग (व्यय १०/अर्थसं-४), मंत्रालय, मुंबई.
८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर / नाशिक
१०) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग,
११) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.